**जिल्हा न्यायालय, परभणी अंतर्गत दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) व न्यायदंडाधिकारी, प्रथम वर्ग, पूर्णा व औंढा-नागनाथ या न्यायालयासाठी फर्निचर खरेदी करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
विधी व न्याय विभाग,
**शासन निर्णय क्र.फरनि२४१०/३९७/(४३)/का.१२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
**दिनांक : १८ मार्च, २०११.**

**वाचा :-** जिल्हा न्यायालय, परभणी यांचे पत्र क्र.वित्त/फरनि/४७५९/२०१०, दिनांक २८.६.२०१०.

<u>शासन निर्णय</u> :-

जिल्हा न्यायालय, परभणी अंतर्गत दिवाणी न्यायाधीश (कनिष्ठ स्तर) व न्यायदंडाधिकारी, प्रथम वर्ग, पूर्णा व औंढा- नागनाथ ही न्यायालये नव्याने कार्यान्वित झालेली आहेत. स्टँडर्ड फॉर्मेट पॅटर्नप्रमाणे प्रत्येक न्यायालयासाठी रु.२ लक्ष याप्रमाणे विषयांकित दोन्ही न्यायालयांसाठी मिळून रु.४,००,०००/- (रुपये चार लक्ष फक्त) इतक्या रकमेचे फर्निचर खरेदी करण्यास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

२. या प्रित्यर्थ होणारा खर्च मागणी क्र.जे-१, २०१४-न्यायदान, १०५-दिवाणी व सत्र न्यायालये, १०५(२) जिल्हा व सत्र न्यायाधीश, (२०१४ ०१७ २) १३-कार्यालयीन खर्च या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात येऊन तो सन २०१०-११ या कालावधीत मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका १९७८ शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र १००८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५.५.२००९ अन्वये केलेल्या सुधारणांनुसार भाग-पहिला उप विभाग-२ मधील अ.क्र.३ नियम क्र.७ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( शिरीष संकपाळ )**
**कार्यासन अधिकारी.**